नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात अधिसुचित विशिष्ट नागरी सेवा व सुविधा पुरविण्यासाठी निधी उपलब्ध करून देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०२४/प्र.क्र.५३/का-१४११,**
**मंत्रालय, मुंबई४००- ०३२**
**दिनांक :- १९ जुलै, २०२४.**

**वाचा :-** शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(३६)/का.१४११, दि.१४ मार्च, २०२४.

**प्रस्तावना:-**

विषयांकित योजनेच्या वाचा येथील शासन निर्णयान्वये गंगापूर नगरपरिषदे अंतर्गत विकास कामांसाठी रु.१५.०० कोटी इतका निधी मंजूर करण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र. ६ व ७ येथील नमूद विकासकामांची मान्यता रद्द करुन सुधारित विकास कामांस शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त वाचा येथील शासन निर्णया सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र. ६ व ७ येथील विकास कामांना देण्यात आलेली मंजूरी रद्द करुन खालीलप्रमाणे सुधारीत विकास कामांना शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रु. लक्ष)

| अ.क्र. | रद्द करावयाची कामे | रक्कम | नव्याने मंजूर करावयाची कामे | रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | गंगापूर नगरपरिषद अंतर्गत प्रभाग ४ येथील गाढेकर यांचे घर ते नवाबपुरवाडी रोडपर्यंत सिमेंट रस्ता करणे | १००.०० | गंगापूर नगरपरिषद अंतर्गत वार्ड क्र.२ गट नं.५ मराठा समाजासाठी सभागृह व ग्रंथालय, अभ्यासिका बांधकाम करणे. | २००.०० |
| २ | गंगापूर नगरपरिषद अंतर्गत प्रभाग ६ येथील इम्रान पटेल यांचे घर ते न.पा. शाळेपर्यंत सिमेंट रस्ता करणे | १००.०० | | |
| | **एकुण** | **२००.००** | | **२००.००** |

२. या संदर्भातील इतर अटी व शर्ती वाचा येथील शासन निर्णयाप्रमाणे लागू राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०७१९१२३५५२९११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI

Digitally signed by CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A75E4CF904B78F2AE051843EA1BA6106A393C2B0CF60FE03C945913B2BAE935F, cn=CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
Date: 2024.07.19 12:48:55 +05'30'

**(चारुशीला चौधरी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभाग,
२. जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर,

३. मुख्याधिकारी, गंगापूर नगरपरिषद, जि. छत्रपती संभाजीनगर,
४. जिल्हा नियोजन अधिकारी, छत्रपती संभाजीनगर,
५. मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) महोदयांचे उप सचिव,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर,
९. वित्त विभाग, व्यय-८/कोषा प्रशासन-५/अर्थसंकल्प-१६, मंत्रालय, मुंबई,
१०. निवड नस्ती (का-१४११), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.